राज्यातील ८ जिल्ह्यात मोबाईल कर्करोग तपासणी करीता डायग्नोस्टिक कॅन्सर व्हॅन कार्यान्वित करण्याकरीता लेखाशिर्ष २२१००१४६ मध्ये विधानमंडळाच्या द्वितीय अधिवेशन (पावसाळी) २०२४ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला निधी वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पुरमा-२०२४/प्र.क्र.१६७/आरोग्य-४

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २८ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.प्रशामा-२०२३/प्र.क्र.३५२/आरोग्य-४, दिनांक ०२.०१.२०२४.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पूरक-२०२४/प्र.क्र.७९/अर्थ-३, दिनांक २९.०७.२०२४
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग ), मुंबई यांचे पत्र क्र.आसेआINCD/NP-NCD/कॅन्सर तपासणी वाहने/मनुष्यबळ/निधी वितरण/१०१९-२६/२०२४, दिनांक १५.१०.२०२४.

**प्रस्तावना:-**

राज्यातील ८ जिल्ह्यात मोबाईल कर्करोग तपासणी करीता डायग्नोस्टिक कॅन्सर व्हॅन कार्यान्वित करण्याकरीता लेखाशिर्ष २२१० ०१४६ (१०-कंत्राटी सेवा व २४-पेट्रोल, तेल, वंगण) मध्ये १०-कंत्राटी सेवा या उद्दिष्टासाठी विधानमंडळाच्या द्वितीय अधिवेशन (पावसाळी) २०२४ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला रु.५०.४० लक्ष व पेट्रोल, तेल, वंगणकरीता रु.२८.८० लक्ष असे एकूण रु.७९.२० लक्ष इतका निधी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील ८ जिल्ह्यात मोबाईल कर्करोग तपासणी करीता डायग्नोस्टिक कॅन्सर व्हॅन कार्यान्वित करण्याकरीता लेखाशिर्ष २२१० ०१४६ (१०-कंत्राटी सेवा व २४-पेट्रोल, तेल, वंगण) मध्ये १०-कंत्राटी सेवा या उद्दिष्टासाठी विधानमंडळाच्या द्वितीय अधिवेशन (पावसाळी) २०२४ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला रु.५०.४० लक्ष व पेट्रोल, तेल, वंगणकरीता रु.२८.८० लक्ष असे एकूण रु.७९.२० लक्ष (अक्षरी रुपये एकोणऐंशी लक्ष वीस हजार फक्त) इतका निधी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS)वितरीत करुन सर्व बाबींची खातरजमा करुन विहीत कार्यपध्दतीने खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर बाब नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची व संनियंत्रण करण्याची संपूर्ण जबाबदारी, आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई व सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई यांची राहील.

०३. राज्यातील ८ जिल्ह्यात मोबाईल कर्करोग तपासणी करीता डायग्नोस्टिक कॅन्सर व्हॅन कार्यान्वित करण्याकरीता मागणी क्र. आर-१, **मनुष्यबळ-** २२१०- ०६ सार्वजनिक आरोग्य विभाग, (००१) संचालन व प्रशासन, ८००- स्तर खर्च उपशिर्ष-८०० : (एक) सार्वजनिक आरोग्य परिवहन संघटनेची आस्थापना, (२२१० ०१४६), १०-कंत्राटी सेवा आणि **पेट्रोल तेल वंगण-** २२१०-०६ सार्वजनिक आरोग्य विभाग, (००१) संचालन व प्रशासन, ८००- स्तर खर्च उपशिर्ष-८०० : (एक) सार्वजनिक आरोग्य परिवहन संघटनेची आस्थापना, (२२१० ०१४६), २४- पेट्रोल, तेल व वंगण या उद्दीष्टांतर्गत मंजूर झालेला निधी संवितरीत करण्यासाठी “मुख्य प्रशासकीय अधिकारी, उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व), यांचे कार्यालय” यांना “आहरण संवितरण अधिकारी” आणि “उपसंचालक, आरोग्य सेवा, परिमंडळे (सर्व)” यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

०५. हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार व वित्त विभागाने ई-फाईल नं.पीएचडी-१७/५/२०२५-पीएचडी (आरोग्य-४) वर दिनांक २५.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२८१०५२५१३९१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA PRADIP PISE

Digitally signed by KAVITA PRADIP PISE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH AND FAMILY WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=895d4dc43ba3105440c0329431446ae8333ab89578925b2d77d3806165dbd487, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AEEF37624AA6E5EA1AAA99D244C6C2A5F135097E5C07486A35D423835B4EC728, cn=KAVITA PRADIP PISE
Date: 2025.03.28 11:13:33 +05'30'

**(कविता पिसे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई
५) उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे.
६) उपसंचालक, आरोग्य सेवा, परिमंडळे (सर्व)
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षण/लेखा अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.

८) वित्त विभाग (व्यय-१३/अर्थ-९), मंत्रालय, मुंबई.

९) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प कार्यासन), मंत्रालय, मुंबई.

१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

११) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

१२) निवडनस्ती (आरोग्य-४)